**वसंतदादा शुगर इन्स्टिट्यूट मांजरी (बु.) ता.हवेली जिल्हा पुणे या संस्थेस सन २०२४-२०२५ आर्थिक वर्षाकरीता संशोधनासाठी सहाय्यक अनुदान मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ससाका-०६२४/प्र.क्र. ११५ /२५स**
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १२/०८/२०२४

<u>वाचा -</u>

१) शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र.३१९०/अ-७३/३-स,दि. ०४/०१/१९९२
२) शासन निर्णय सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.ससाका१००९/प्र.क्र.१३७१/प्र.क्र.१२/२५-स, दि.१७/०६/२००९
३) शासन निर्णय सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.ससाका१००८/प्र.क्र. ५८/२५- स दि. १२/०३/२००८
४) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्र ससाका१००९/प्र.क्र.१२६/ २५-स, दि. १८/०८/२००९
५) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्र ससाका ११२२ /प्र.क्र.२८१/ २५-स, दि.२९/०३/२०२३
६) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्र ससाका ०७२३ /प्र.क्र.२०५/ २५-स, दि.२९/०८/२०२३
७) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्र ससाका ११२३ /प्र.क्र.३१०/ २५-स, दि.१६/०१/२०२४
८) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं २०२४/ प्र.क्र.८०/ अर्थ-३ दि.२५/०७/२०२४
९) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा.क्र. साआ /अर्थ-६ /कक्ष-६ /निधी वितरण प्रस्ताव/ VSI/ अनुदान/ ८४८/२०२४ दि.०८/०७/२०२४.

**<u>प्रस्तावना :</u>**

वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट मांजरी (बु.) ता.हवेली, जिल्हा पुणे या संस्थेस आर्थिक वर्ष २००९-१० पासून दरवर्षी संशोधन सहाय्याची तरतूद किमान रु.५.०० कोटी तसेच गाळप ५०० लाख मे.टनापेक्षा जास्त झाल्यास या तरतूदीत त्यावरील गाळपावर प्रतिटन रु.१/- वाढ करण्याबाबत दि.१७/६/२००९ च्या शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे. शासन निर्णय दि.१७/०६/२००९ मधील तरतूदीनुसार वसंतदादा शुगर इन्स्टिट्यूट, जि. पुणे या संस्थेस किमान रु.५.०० कोटी इतके अनुदान देय आहे. साखर आयुक्त, पुणे यांनी दि.०८/०७/२०२४ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने आणि वित्त विभागाच्या दि.२५/०७/२०२४ च्या परिपत्रकातील तरतूदीनुसार साखर संशोधनासाठी सहाय्यक अनुदान यासाठी सन २०२४-२०२५ मध्ये रु. ५.०० कोटी (अक्षरी रु. पाच कोटी फक्त) इतके अनुदान वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय :</u>**

२. वसंतदादा शुगर इन्स्टिट्यूट, मांजरी (बु.), ता. हवेली, जिल्हा- पुणे या संस्थेस "मागणी क्रमांक-व्ही-२ मुख्यलेखाशीर्ष - २४२५ - सहकार,- १०८ इतर सहकारी संस्थांना सहायक-(०३) सहकारी साखर कारखाने (०३) (०६) साखर संशोधनासाठी सहायक अनुदान (२४२५ १०४५) -३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशीर्षाअंतर्गत सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षा करिता उपलब्ध अर्थसंकल्पीत तरतुद रू.५.०० कोटी (अक्षरी रु.पाच कोटी फक्त) इतक्या वितरणास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर निधी " मागणी क्र.व्ही-२ मुख्यलेखाशीर्ष - २४२५ - सहकार,- १०८ इतर सहकारी संस्थांना सहाय्यक (०३) सहकारी साखर कारखाने (०३) (०६) साखर संशोधनासाठी सहाय्यक अनुदान (२४२५ १०४५) -३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा. सदरहू निधीचा वापर करताना शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.ससाका- १००९/प्र.क्र. २६/२५ स, दि.१८ ऑगस्ट, २००९ अन्वये विहित करण्यात आलेल्या नियम व अटीचे पालन करणे बंधनकारक आहे. तसेच सदर रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र संस्थेने सदर अनुदानाचा संपुर्ण विनियोग केल्यानंतर सनदी लेखा परिक्षकाकडून प्रमाणित करुन हे वित्तीय वर्ष संपल्यानंतर परंतु, पुढील वितरणापूर्वी सादर करावे.

३. प्रस्तुत प्रकरणी लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यानुसार लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांनी वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी बु., ता. हवेली, जिल्हा - पुणे (VASANTDADA SUGAR INSTITUTE, MANJARI (BK.) TALUKA-HAVELI, DISTRICT-PUNE) या संस्थेस अनुदान म्हणून मंजूर केलेली रक्कम रु.५.०० कोटी (अक्षरी रु.पाच कोटी फक्त) निधी जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे यांचे कार्यालयामार्फत त्या संस्थेला वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

४. प्रमाणित करण्यात येते कि, या प्रकरणी शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२४ / प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५/०७/२०२४ सोबतच्या परिशिष्टातील अटींची पूर्ततेच्या अधिन राहून तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४८५/व्यय-२,दि.३०/०७/२०२४ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरून प्रस्तुत शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८१२१७०८३४९२०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANKUSH PANDURANG SHINGADE

Digitally signed by ANKUSH PANDURANG SHINGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D173346155B9208DCD97DD078B, cn=ANKUSH PANDURANG SHINGADE
Date: 2024.08.12 17:23:21 +05'30'

**( अंकुश पां. शिंगाडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे (३ प्रती)
२) प्रधान महालेखापरिक्षक, लेखापरिक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
५) महालेखापाल -१, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) महालेखापाल -२, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९) लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे (३प्रती)
१०) सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर)
११) वित्त विभाग (व्यय-२), कराधान-३ व अर्थसंकल्प-१२, (अर्थोपाय शाखा)
१२) महासंचालक, वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी (बु.),ता. हवेली, जिल्हा - पुणे.
१३) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.
१४) सहसंचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय इमारत,मंत्रालय, मुंबई.
१५) कक्ष अधिकारी, १६-स तथा वेब को-ऑर्डिनेटर, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती (२५-स).